**महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या ३ महिन्यांकरिता अनुदान वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

**शासननिर्णयक्रमांकः बियुडी २०२०/प्र.क्र. ५८ /का.४**

मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८.०४.२०२०

वाचा-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०

२) पीठासीन अधिकारी/अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र, क्रमांक: २०२०/म.रा.वक्फ.न्या./लेखा/ १७१/, दि.२० एप्रिल, २०२०

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या ३ महिन्यांच्या कालावधीकरिता अनिवार्य खर्चासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय:**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु. **१, ४६,१५,०००**/- (रुपये एक कोटी सेहचाळीस लाख पंधरा हजार मात्र ) इतके अनिवार्य खर्चासाठी अनुदान मंजूर करण्यात आले आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या तीन माहसाठी अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये अनुदान वितरणाची मागणी केल्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या तीन महिन्यांच्या कालावधीसाठी रु. १४,५७,५०० /- (रुपये चौदा लाख सत्तावन्न हजार पाचशे मात्र) इतके अनुदान खाली दर्शविलेल्या मासिक निधी विवरणाप्रमाणे अध्यक्ष, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

| “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८)” | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | लेखाशिर्ष तपशीलवार | सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पीय अंदाज | माहे एप्रिल २०२० ते माहे जुन, २०२० साठी वितरणासाठी उपलब्ध अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान | | |
| | | | | एप्रिल, २०२० | मे, २०२० | जुन, २०२० |
| १ | ०१ वेतन | १,२७,७१,००० | १२,७७,१०० | ४,२५,७०० | ४,२५,७०० | ४,२५ ,७०० |
| २ | ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ८४,००० | ८,४०० | २,८०० | २,८०० | २,८०० |
| ३ | १३ कार्यालयीन खर्च | ८,९२,००० | ८९,२०० | २९,७३३ | २९,७३३ | २९,७३४ |
| ४ | १४ भाडेपट्टी व कर | ७,५०,००० | ७५,००० | ७५,००० | ० | ० |
| ५ | २४ पेट्रोल तेल व वंगण | ७८,००० | ७८०० | २,६०० | २,६०० | २,६०० |
| | **एकूण** | **१, ४५,७५,०००** | **१४,५७,५००** | **५,३५,८३३** | **४,६०,८३३** | **४,६०,८३४** |

उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८) अनिवार्य” या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२०/प्र.क्र. ६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२८१२०७०१७३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, serialNumber=b88babb31cb2c1163b5a1e41e86d809272fea914814734600d0b42642848c06f, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2020.04.28 12:37:00 +05'30'

( तुषार दि.राठोड )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अध्यक्ष/पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
२. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
४. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.